अर्थसंकल्प प्राथम्य

सन २०१५-१६ मधील मंजूर अर्थसंकल्पीत तरतूदीचे वितरण करणेबाबत.
डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजना.
(विशेष घटक योजना) (२४२५१२२३).

# महाराष्ट्र शासन
## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
## शासन निर्णय क्रमांकः अर्थस १०१५ / प्र.क्र.२२४ /२-स

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ३१ ऑक्टोबर, २०१५

वाचा -

1) **शासन निर्णय क्रमांकः सीसीआर ०६१२/प्र.क्र.२६९/२ सदि.३/१२/२०१२**
2) **शासन निर्णय क्रमांकः व्यासयो २१३/प्र.क्र.६११/२ स दि.५/२/२०१४**
3) **वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३,दि.१७/४/२०१५**
4) **वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २०१५/प्र.क्र.३४/कोषा-प्रशा-५,दि.२४/७/२०१५**

प्रस्तावना -

राज्यातील शेतकऱ्यांना सहकारी कृषी पत संस्थांमार्फत पीक कर्जावरील व्याज दरात वसुलीशी निगडीत प्रोत्साहनात्मक सवलत देण्याचा निर्णय शासनाने दि.२४.११.१९८८ च्या शासन निर्णयान्वये घेतला आहे. त्यानुसार दि.२/११/१९९१ च्या शासन निर्णयानुसार डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजना दि.०१/०४/१९९० पासून कर्ज घेतलेल्या शेतकऱ्यांना लागू करण्यात आली आहे. या योजने अंतर्गत सहकारी कृषी पतसंस्थेकडून पीक कर्ज घेणाऱ्या व त्याची प्रतीवर्षी ३० जून पर्यंत संपूर्ण परतफेड करणाऱ्या शेतकऱ्यांना व्याज सवलत देण्यात येत आहे. राष्ट्रीयकृत बँका, ग्रामीण बँका व खाजगी बँकांकडून कर्ज घेणा-या शेतक-यांनाही सदर योजना लागू आहे. मात्र थकीत कर्जास तसेच मध्यम मुदत व दीर्घ मुदत कर्जास सदरची योजना लागू नाही. या योजने अंतर्गत शेतकऱ्यांना सहकारी कृषी पतसंस्थांमार्फत व बँकांमार्फत मिळणाऱ्या पीक कर्जावरील व्याज दराशी निगडीत व्याज सवलत देण्यात येत आहे. दि.०३.१२.१२ रोजीच्या शासन निर्णयानुसार रू.१.०० लाखापर्यंतच्या पीक कर्जावर वार्षिक ३% व त्यापुढील रु.३.०० लाखापर्यंतच्या पीक कर्जावर वार्षिक १% दराने व्याज सवलत लागू करण्यात आलेली आहे.

सन २०१५-१६ या चालू आर्थिक वर्षासाठी डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजना (विशेष घटक योजना) खाली मंजूर अर्थसंकल्पित तरतूदीचे वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

१ सन २०१५-१६ या चालू आर्थिक वर्षासाठी डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजना (विशेष घटक योजना) खाली रु. ७६४.८३ लाख अर्थसंकल्पित तरतूद मंजूर असून त्याबाबत खालील प्रमाणे निधीचे वितरण करण्याचा निर्णय घेण्यात येत आहे.

या योजनेखाली वित्त विभागाच्या उपरोक्त वाचा क्र . ३ येथील शासन परिपत्राकामधील सूचनेनुसार परिच्छेद क्र ७ ते १८ मधील मुददा क्र ९ या योजनेशी संबंधित असून त्याची पूर्तता क्षेत्रीय कार्यालयाकडून होत या योजनेखालील मंजूर अर्थसंकल्पित निधीच्या एकूण वार्षिक **तरतूदीच्या ७० टक्के म्हणजेच रु.५३५.३८ लाख (रुपये पाच कोटी पस्तीस लाख अडतीस हजार फक्त)** एवढया निधीचे वितरण करुन खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. उर्वरीत निधीच्या वितरणास शासनाची मान्यता प्राप्त झाल्यानंतर निधीचे वितरण करण्यात येईल.

सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य कार्याल्याने वित्त विभागाच्या उपरोक्त वाचा क्र ४ येथील शासन परिपत्रकामधील सूचनांचे पालन करावे.

२. वरील योजनेवर होणारा खर्च सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा व तो पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात यावा.

**मागणी क्र.व्ही-२**
मुख्य लेखाशिर्ष-२४२५ सहकार
१०७,सहकारी पतसंस्थांना सहाय्य
(०२)(०७) डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजना
(विशेष घटक योजनांतर्गत) (दत्तमत्त) (२४२५१२२३)
३३, अर्थसहाय्य

३. सदरचा निधी वितरीत करण्याकरिता लेखाधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना या आदेशाव्दारे आहरण व संवितरण अधिकारी तसेच सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य,पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर रकमेचा विनियोग विहीत केलेल्या अटी व शर्तीनुसार करण्यात यावा. तसेच योजनेवर झालेला विकासमंडळ निहाय खर्च व लाभार्थ्यांची संख्या याची माहिती नियोजन विभागाच्या योजना माहिती प्रणाली (MPSIMS) वर दर महिन्याच्या अखेरीस न चुकता भरण्यात यावी.

सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३,दि.१७/४/२०१५अन्वये प्रशासकीय विभागाला असलेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५११०२१११००९८९०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Shankar Bhujbal

Digitally signed by Ashok Shankar Bhujbal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ashok Shankar Bhujbal
Date: 2015.11.02 11:15:03 +05'30'

**(अ.शं.भुजबळ)**
कक्ष अधिकारी

**प्रत,**

१ सह सचिव (व्यय-२ व अर्थ-१३) वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई.
२ सह सचिव (कार्या १४३१) नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई.
३ उप सचिव, सामाजिक न्याय विभाग (वि.घ.यो.१), मंत्रालय,मुंबई.
४ उपसचिव (अर्थसंकल्प-१७ स) सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई.
५ सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य,पुणे.
६ मा.प्रधान सचिव (सहकार). सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई
७ निवड नस्ती कार्या २ स, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई.